**शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या सहाय्यक अनुदानाची कार्यवाही ग्रंथालय अनुदान व्यवस्थापन प्रणाली (Library Grant Management System) व्दारे करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मराग्रं-२०२२/प्र.क्र.११२/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ जुलै, २०२३.

<u>**वाचा**</u> **:-** ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र. ३२/२०२३-२४/२६९६, दि. २७/०६/२०२३.

**<u>प्रस्तावना -</u>**

महाराष्ट्र शासनाने सार्वजनिक ग्रंथालयांचे महत्त्व ओळखून "महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालय अधिनियम, १९६७" मंजूर केला आहे. सदर अधिनियमातील तरतूदीनुसार महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालये (सहाय्यक अनुदान आणि इमारत व साधसामग्री यासाठी मान्यता) नियम, १९७० तयार करण्यात आले आहेत. राज्यातील शासनमान्यता प्राप्त सार्वजनिक ग्रंथालयांना सद्यस्थितीत ग्रंथालय संचालनालयाच्या अधिनस्त जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयांमार्फत सहाय्यक अनुदान वितरित करण्यात येते.

सदर अनुदान वितरण पध्दत कालानुरुप अधिक सुलभ, प्रभावी, पारदर्शक व गतिमान होण्याच्या दृष्टीने संगणकाधारीत पध्दत अंगीकारणे आवश्यक आहे. ई - प्रशासनाच्या दिशेने एक पाऊल या अनुषंगाने, शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या सहाय्यक अनुदानाची कार्यवाही ग्रंथालय अनुदान व्यवस्थापन प्रणाली (Library Grant Management System) च्या माध्यमातून करुन ग्रंथालयांचे अनुदान थेट ग्रंथालय संचालनालयाकडून ग्रंथालयांच्या बँक खाती ईसीएस (ECS) व्दारे जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सद्यस्थितीत राज्यातील शासन मान्य सार्वजनिक ग्रंथालयांना दरवर्षी परिरक्षण अनुदान दिले जाते. सदर अनुदान शासनाकडून ग्रंथालय संचालक व ग्रंथालय संचालकांकडून जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांच्याकडे वितरीत केले जाते. संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयांकडून जिल्ह्यातील सार्वजनिक ग्रंथालयांना अनुदान वितरीत करण्याची कार्यपध्दती अस्तित्वात आहे. सन २०२३-२४ या वर्षापासून शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना ग्रंथालय अनुदान व्यवस्थापन प्रणाली (Library Grant Management System-LGMS) व्दारे अनुदान वितरीत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. सदर प्रणालीबाबतची सर्वसाधारण कार्यवाही खालीलप्रमाणे राहिल :-

**(१)** शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयाचा ग्रंथालय क्रमांक हा त्या-त्या ग्रंथालयाचा युझर आयडी राहील. ग्रंथालय संचालनायाकडून संबंधित ग्रंथालयांच्या अधिकृत ई-मेल व मोबाईल क्रमांकावर सदर प्रणाली (System) ची लिंक, पासवर्ड व ओटीपी पाठविण्यात येतील. ज्याव्दारे संबंधित ग्रंथालये लॉग ईन करुन त्या-त्या वर्षी वार्षिक अहवालातील माहिती व अंकेक्षण अहवालातील सर्व माहिती भरुन आवश्यक तेथे कागदपत्रे अपलोड करतील. सदर कार्यवाही ग्रंथालय संचालनालयाकडून दिलेल्या मुदतीत करण्याची जबाबदारी संबंधित सार्वजनिक ग्रंथालयाची राहिल.

**(२)** सदर प्रणाली (LGMS) व्दारे करण्यात येणाऱ्या कामकाजाच्या कार्यपध्दतीबाबत सविस्तर सूचना ग्रंथालय संचालनालयाकडून सर्व सहायक ग्रंथालय संचालक / जिल्हा ग्रंथालय अधिकारी या कार्यालयांना देण्यात याव्यात.

**(३)** सदर प्रणाली (LGMS) बाबत शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना मार्गदर्शन करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांची राहिल. त्यासाठी जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांनी आवश्यकतेनुसार जिल्हा स्तरावर मार्गदर्शन / प्रशिक्षण शिबीरांचे आयोजन करावे.

**(४)** सदर प्रणाली (LGMS) चालू वर्षी प्रथमच लागू करण्यात येत असल्याने शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांनी सन २०२३-२४ च्या अनुदानासाठी वार्षिक अहवाल संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयांकडे यापूर्वीच सादर केले असतील तरी त्यांनी आता सदर प्रणालीमध्ये (LGMS) वार्षिक अहवाल भरणे आवश्यक आहे.

**(५)** सदर प्रणाली (LGMS) वर शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांकडून प्राप्त अहवाल, सर्व कागदपत्रे व माहिती पडताळणे/तपासणे, तद्अनुषंगिक सर्व कामकाजाची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयाची राहील.

**(६)** शासनाकडून अनुदान प्राप्त झाल्यावर ग्रंथालय संचालनालयाकडून केंद्रीय पध्दतीने अनुदान वितरण थेट शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात येईल.

**(७)** सदर प्रणाली चालू आर्थिक वर्षापासून लागू करण्यात येत असून यापुढे शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सदर प्रणाली (LGMS) मार्फत अनुदान वितरीत करण्यात येईल ही बाब सर्व सार्वजनिक ग्रंथालयांच्यास निदर्शनास आणण्यात यावी.

३. सदर प्रणाली विकसित करण्यासाठी स्थापन केलेल्या तांत्रिक पथकाकडून (Technical Team) ही प्रक्रिया पूर्ण करुन घेण्याची जबाबदारी ग्रंथालय संचालकांची राहिल. त्याअनुषंगाने ग्रंथालय संचालकांनी एका माहितगार अधिकाऱ्यास नोडल अधिकारी म्हणून नियुक्त करावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक सांकेतांक २०२३०७१४१५२६१०३६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2023.07.14 15:28:00 +05'30'

**(प्र. पां. लुबाळ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (१) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (२) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (सामान्य प्रशासन विभाग, मा.तं), मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल, १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई.
१२. ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१३. सर्व सहायक ग्रंथालय संचालक / जिल्हा ग्रंथालय अधिकारी,
(संचालक, ग्रंथालय संचालनालय यांचे मार्फत) .

१४. अधिदान व लेखाअधिकारी

१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

१६. कार्यासन साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७. निवडनस्ती साशि-५, मंत्रालय, मुंबई.